इतर मागास बहुजन कल्याण विभागातील कर्मचाऱ्यांच्या दैनंदिन कार्यालयीन उपस्थितीकरिता बायोमॅट्रीक मशिन खरेदी करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन आदेश क्रमांक- आस्थाप्र-२०२२/प्र.क्र.१५८/आस्थापना-१,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २० जून, २०२३

**वाचा:- शासन निर्णय इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्रमांक/आस्थाप्र-२०१९/प्र.क्र. १०६/आस्था-१, दि.१८.०४.२०२२**

**आदेश**

इतर मागास बहुजन कल्याण विभाग (खुद्द) च्या कार्यालयीन वापराकरीता सामान्य प्रशासन विभागाने उपलब्ध करुन दिलेली जागा अपूरी पडत असल्याने मंत्रालय परिसरातील मोतीमहल इमारतीतील रुम नं.५, दुसरा मजला, १९५ जे. टाटा मार्ग, चर्चगेट, मुंबई येथील २००० चौ.फुट इतकी जागा भाड्याने घेण्यास संदर्भिय शासन निर्णय दि.१८.०४.२०२२ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

२. मंत्रालयीन विभागांतील सर्व अधिकारी / कर्मचारी यांनी आपली दैनंदिन कार्यालयीन उपस्थिती बायोमॅट्रीक मशिनवर नोंदविणे अनिवार्य आहे. या विभागाच्या कार्यालयीन वापराकरिता भाड्याने घेण्यात आलेल्या मोतीमहल इमारतीच्या जागेत स्थलांतरीत झालेल्या विभागातील अधिकारी/कर्मचाऱ्यांची दैनंदिन उपस्थिती नोंदविण्याकरिता उक्तप्रमाणे बायोमॅट्रीक मशिन खरेदी करण्याच्या अनुषंगाने, इच्छूक पुरवठादारांकडून दरपत्रके मागविण्यात आली होती. त्यास अनुसरुन एकूण ५ पुरवठादांकडून दरपत्रके प्राप्त झाली असुन, त्यांचा तुलनात्मक तक्ता पुढीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | पुरवठादाराचे नाव | दरपत्रक सादर केल्याचा दिनांक | दर जी.एस.टी.सह प्रति युनीट (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | झेनॉन सिस्टीम, ठाणे | ०६.०२.२०२३ | ६४,७५८ |
| २ | रुद्राक्ष एक्सलन्सी, सोलापूर | ०९.०२.२०२३ | ६७,८५० |
| ३ | घाडीगांवकर ॲण्ड कंपनी, बदलापूर, ठाणे | १४.०२.२०२३ | ३५,५७७ |
| ४ | डी.एस.एन्टरप्रायजेस, काळाचौकी, मुंबई | १६.०२.२०२३ | ३५,०४६ |
| ५ | फ्युचर इन्फोटेक, फोर्ट, मुंबई | १७.०२.२०२३ | ३१,६५४ |

३. उपरोक्त तुलनात्मक तक्यातील पुरवठादारांची दरपत्रके माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने उपलब्ध करुन दिलेल्या स्पेसिफिकेशन नुसार आहेत किंवा कसे याबाबत संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई यांचेकडून अभिप्राय मागविले असता, माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने या विभागास प्राप्त दरपत्रकांपैकी झेनॉन सिस्टीम, ठाणे व रुद्राक्ष एक्सलन्सी, सोलापूर या दोन संस्थांनी सादर केलेले स्पेसिफिकेशन माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने उपलब्ध करुन दिलेल्या स्पेसिफिकेशनप्रमाणे असून फ्युचर इन्फोटेक, फोर्ट, मुंबई या संस्थेचे स्पेसिफिकेशन, माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने उपलब्ध करुन दिलेल्या स्पेसिफिकेशन प्रमाणे नाहीत. तसेच घाडीगांवकर ॲण्ड कंपनी, बदलापूर, ठाणे व डी.एस.एन्टरप्रायजेस, काळाचौकी, मुंबई यांनी दरपत्रकासोबत स्पेसिफिकेशन सादर केले नसल्याचे अभिप्राय दिले आहेत.

४. उक्त अभिप्रायानुसार परिच्छेद क्र.२ येथील तक्त्यातील झेनॉन सिस्टीम, ठाणे व रुद्राक्ष एक्सलन्सी, सोलापूर या दोनच संस्थानी सादर केलेले स्पेसिफिकेशन, माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने उपलब्ध करुन दिलेल्या स्पेसिफिकेशनप्रमाणे असल्याने, या दोन संस्थांपैकी कमी दर (L-१) म्हणजेच रु.६४,७५८/- इतका दर असलेल्या झेनॉन सिस्टीम, ठाणे या संस्थेकडून कर्मचाऱ्यांच्या दैनंदिन उपस्थिती

बायोमॅट्रीक मशिन खरेदी करुन मोतीमहल येथील विभागाच्या कार्यालयात बसवून घेण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

५. उक्त बाबीसाठी होणारा खर्च मागणी क्र. झेडजी-२, २२५१, सचिवालय-सामाजिक सेवा-(०१) ई-गव्हर्नन्स प्रकल्प राज्य योजना (०१) (०१) ई-शासन प्रकल्पाची अंमलबजावणी (कार्यक्रम) (२२५११३३४) १७ संगणक खर्च या लेखाशिर्षांतर्गत सन २०२३-२४ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६२०१५१७०८७६३४ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c550dd52f3943153bdbd47e381bb9818c91359bd0588e1b35b3c0c18ad7bf938, pseudonym=B6DDBEDBC1E63E4332429DB625320D8F56899C89, serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2023.06.20 15:18:32 +05'30'

**( कैलास ता. साळुंके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक
२. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), मुंबई
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. लेखा अधिकारी (रोखशाखा), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. मे.झेनॉन सिस्टीम्स प्रा.लि., ६०१, विनीता अपार्टमेंट, गोखले रोड, ठाणे (प.) ४०० ६०२.
९. निवडनस्ती (आस्थापना-१).